<u>मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजना</u>

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सौरप्र-२०१८/प्र.क्र.४०१८/ऊर्जा-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ जानेवारी, २०१९.

<u>संदर्भ :</u> (१) शासन निर्णय, ऊर्जा विभाग क्र.सौरप्र २०१८/प्र.क्र.४०१/ऊर्जा-१, दि.१५ नोव्हेंबर, २०१८
(२) महावितरण कंपनीचे पत्र क्र.बुअ(वितरण) २७५६८, दि.२२ नोव्हेंबर, २०१८.

***<u>प्रस्तावना</u> :-***

शेतकऱ्याला सिंचन करणे शक्य व्हावे व राज्य शासनाची पारंपारिक पद्धतीने कृषीपंप जोडणीसाठी लागणाऱ्या खर्चाच्या बचतीचे उद्दिष्ट साध्य व्हावे याकरिता राज्यातील कृषी वापरासाठी पारेषण विरहित १ लाख सौर कृषी पंप टप्प्याटप्प्यात उपलब्ध करुन देण्याकरिता राज्यात मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार सुरु करण्यात आली आहे.

०२. सदर योजनेच्या अंमलबजावणीची जबाबदारी महावितरण कंपनीवर टाकण्यात आली असून, योजना यशस्वीरित्या राबविण्याच्या दृष्टीने व सौरपंप घेण्यासाठी अर्जदारांना प्रोत्साहित करण्याच्या दृष्टीने त्यात बदल करण्याची विनंती विभागास संदर्भ क्र.२ येथील पत्राद्वारे प्राप्त झाली आहे. त्या अनुषंगाने शासन निर्णयात काही बदल करण्याची बाब विचाराधिन होती. त्या अनुषंगाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात पुढील बदल करण्यात येत आहेत.

***शासन निर्णय :-***

१. योजनेच्या आर्थिक भारात कोणतीही वाढ न करता लाभार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सौर कृषी पंपासोबत दोन एलईडी डीसी बल्ब, एक डीसी पंखा व एक मोबाईल चार्जिंग सॉकेट समाविष्ट करण्यात येत आहे. याची निवड व कार्यपद्धती वेगळयाने महावितरणद्वारे निश्चित करण्यात येईल.

२. योजनेसाठी लागणाऱ्या निधीबाबत सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांची संख्या निश्चित करुन त्याचा त्यापैकी लाभार्थ्यांचा हिस्सा वगळून सर्वसाधारण गटाकरिताचा राज्य हिस्सा, अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांकरिता राज्य शासनाकडून विशेष घटक योजना व अनुसूचित जाती/जमातीच्या लाभार्थ्यांसंदर्भातील राज्य शासनाकडून

आदिवासी उपाययोजनेमधून देय ठरणारी अर्थसंकल्पीत तरतुद महावितरणकडून प्राप्त मागणीनंतर उपलब्ध करण्यात यावी. वीज विक्रीकरातून उपलब्ध होणारा निधी टप्प्याटप्प्याने उपलब्ध करण्यात यावा.

३. लाभार्थी निवडीचे निकषात अतिदुर्गम भागातील शेतकऱ्यांचा प्राधान्याने विचार करावा. तसेच बोर वेल, विहिर, नदी इ. ठिकाणी शाश्वत पाण्याचा स्त्रोत आहे याची खात्री महावितरणद्वारा करुन अशा अर्जदाराचाही विचार करावा.

४. योजनेची अंमलबजावणी करतांना लाभार्थ्याकडे शाश्वत पाण्याचा स्त्रोत उपलब्ध करण्याची जबाबदारी महावितरणद्वारा निश्चित केलेल्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून खात्री करुन घेण्यात यावी. योजनेच्या अंमलबजावणीकरिता निर्माण करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीबाबत असा निर्णय घेण्यात आला आहे की, सदर योजनेत लाभार्थी निवडीची प्रक्रिया कमी अवधीत पूर्ण होण्याच्या दृष्टीने जिल्हास्तरीय समिती रद्द करुन लाभार्थ्यांची निवड करण्याकरिता महावितरणद्वारा ऑनलाईन पोर्टल तयार करण्यात येईल, ज्यामध्ये अर्जदाराला विहित नमुन्यातील अर्जासोबत आवश्यक कागदपत्रे अपलोड करण्याची सुविधा असेल. अर्जदाराचे स्थळ परीक्षण महावितरणद्वारा करण्यात येऊन लाभार्थी निवडीच्या निकषानुसार लाभार्थ्यांची निवड करण्यात येईल.

५. महावितरणकडे असणाऱ्या LMC निधीतून सदर योजनेची प्रसिद्धी व समन्वय साधण्यासाठी येणारा प्रशासकीय खर्च म्हणून रु.८ कोटीपर्यंत वापरण्यात यावा. या निधीच्या मार्गदर्शक तत्वात बदल आवश्यक असल्यास तसा प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावा.

६. योजनेच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील मुद्दा क्र.११ (९) मधील सौर कृषीपंपासाठी पुरवठादाराकडून पाच वर्षांसाठीचा सर्वंकष देखभाल व दुरुस्ती करार नोंदणीकृत करण्याची सक्ती करण्यात येऊ नये. हमी कालावधीत पुरवठादाराची सुरक्षा अमानत/बँक गॅरंटी महावितरणकडे असल्याने, प्रत्येक सेवा पुरविली नाही तर ती रक्कम अशा रकमेतून वसूल करण्यात यावी. तसेच प्रत्येक जिल्ह्यात दुरुस्ती केंद्र उभारणे व तक्रार नोंदणीसाठी टोल फ्री क्रमांक उपलब्ध करुन देण्याची अट टाकण्यात यावी.

७. सदर योजनेच्या संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णयातील मुद्दा क्र.१२ मधील अट क्र.३ येथील जलस्त्रोताचे विभागवार भूजल उपलब्धता नकाशे उपलब्ध करण्याची आवश्यकता नाही, याबाबतची संपुर्ण जबाबदारी महावितरणची राहील.

८. सदर योजनेतील सौर कृषीपंपाद्वारे झालेला वीजवापर हा अपारंपारिक ऊर्जा खरेदी बंधन (RPO) करिता पात्र धरण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०१०११६४५०९४८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prashant Pundalik Badgeri

Digitally signed by Prashant Pundalik Badgeri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae61ab0caff4e0f24ac492ed7902d55ccf49e93124a5c1327133a6da9db8c748, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundalik Badgeri
Date: 2019.01.01 16:52:24 +05'30'

**(प्र. पुं. बडगेरी)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
४) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन मुंबई,
५) सर्व विधानमंडळ सदस्य,विधान भवन, मुंबई,
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
११) सर्व विभागीय आयुक्त,
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई,

१८) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१९) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२०) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२१) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२२) उप सचिव/ ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३) ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४) मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.